श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, तालुका तिवसा, जिल्हा अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी विकास आराखडा - निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २९ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४, दिनांक ३ डिसेंबर, २०१२.

प्रस्तावना :-

श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, तालुका तिवसा, जि.अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी शासन निर्णय, दिनांक ३ डिसेंबर, २०१२ अन्वये मान्यता देण्यात आलेल्या रु. २०.०० कोटीच्या कामांना मंजुरी देण्यात आली आहे. या आराखड्याकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधी पैकी आवश्यकतेनुसार निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, तालुका तिवसा, जिल्हा अमरावती परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठीच्या आराखड्यातील कामांसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना रु.२.९५७९ कोटी (दोन कोटी, पंच्याण्णव लक्ष एकोणऐंशी हजार फक्त) इतका निधी पुढील लेखाशिर्षाखाली व उद्दिष्टासाठी वितरित करण्यात येत आहे:-

| मुख्यलेखाशिर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित तरतूद | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| ३४५२ २८९२ | ३१ सहायक अनुदाने | १५,००,००० | १०,५०,००० |
| ५४५२०१४२ | ५३, मोठी बांधकामे | ४,०७,५६,००० | २,८५,२९,००० |
| **एकूण** | | | **२,९५,७९,०००** |

सदरहू खर्च लेखाशिर्ष “मागणी क्रमांक ओ-८, ३४५२- पर्यटन, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००)(१२) श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता.तिवसा, जि.अमरावती येथे नागरी पायाभूत सोयी सुविधांचा विकास (कार्यक्रम) (३४५२ २८९२) (दत्तमत)” ३१ सहायक अनुदाने व “मागणी क्रमांक ओ-१०, ५४५२- पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००)(०८) श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता.तिवसा, जि.अमरावती परिसरात पायाभूत नागरी

सुविधा (कार्यक्रम) (५४५२ ०१४२) (दत्तमत)” ५३ मोठी बांधकामे या उद्दिष्टाखाली खर्ची टाकण्यात यावा.

वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल नागपूर कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपपत्र विभागीय आयुक्त, अमरावती यांनी शासनास तात्काळ सादर करावे

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२९१४४४५३६७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vidya Hampayya
Date: 2018.11.29 14:48:44 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
शासनाचे उपसचिव.

**प्रत तातडीच्या कार्यवाहीसाठी,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती,
२) जिल्हाधिकारी, अमरावती,

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मा. राज्यमंत्री उद्योग व खणीकर्म, व पर्यावरण तथा पालकमंत्री,(अमरावती) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य,

८) मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई

९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,

१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,

११) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई,

१२) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,

१३) उप सचिव, का.१४२४, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई,

१४) निवड नस्ती, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

------------------